आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२०-२१ या वर्षात केंद्र पुरस्कृत कृषि उन्नती योजना-राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-वाणिज्यिक पिके **ऊस** या योजनेकरीता निधी वितरण.**लेखाशिर्ष (२४०१ अे५९३), (२४०१ अे६०१)**

**महाराष्ट्र शासन**

**आदिवासी विकास विभाग**

शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२०/ प्र.क्र. ७ / कार्यासन-६

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२

तारीख: २८ सप्टेंबर, २०२०.

वाचा -

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२० /प्र.क्र.६४/ अर्थ-३, दि.१६.०४.२०२०.

२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२० /प्र.क्र.६५/ अर्थ-३, दि.०४.०५.२०२०.

३) केंद्र शासन,कृषि मंत्रालयाचे पत्र क्र. F.No.२-९/२०२०-CU-IV, दि.१७.०६.२०२०.

४) कृषि व पदुम विभागाची नस्ती क्र. असुअ-२०२०९/ प्र. क्र.४३/ ४-अे.

**शासन निर्णय-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाकरिता केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान - वाणिज्यिक पिके (कापूस व ऊस ) या योजनेकरीता मागणी क्र. टी-५, २४०१ पीक संवर्धन, ७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) आदिवासी उपयोजनेंतर्गत योजना, (०१) (२५) कृषि उन्नती योजना -राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान- व्यापारी पिके - ऊस (केंद्र हिस्सा) (२४०१ A५९३ ), ३३- अर्थसहाय्य खाली रु. २८.०० लाख तर त्यास समरुप राज्य हिश्याकरिता (०१) (२६) कृषि उन्नती योजना -राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-व्यापारी पिके- ऊस (राज्य हिस्सा ) ( २४०१ A६०१) याखाली रु. १८.०० लाख इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे.

२. कृषि व पदुम विभागाच्या वाचा क्र. ४ येथील प्रस्तावास अनुसरुन उपरोक्त योजनेंतर्गत कापूस या पिकाकरीता केंद्र शासनाकडून प्राप्त निधी केंद्र हिश्श्याकरीता व समरूप राज्य हिश्श्यांकरीता खालीलप्रमाणे एकूण रू.१५.४९ लाख ( अक्षरी रुपये पंधरा लाख एकोणपन्नास हजार फक्त ) इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून सचिव (कृषी ), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर (BEAMS ) वितरीत व खर्च करण्यास मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

{ (रु.लाखात)

| योजनेचे नांव व लेखाशिर्ष | सन २०२०-२१ करीता अर्थसंकल्पित निधी | या शासन निर्णयाद्वारे वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|
| कृषि उन्नती योजना -राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान- व्यापारी पिके - ऊस (२४०१ A५९३ ) (केंद्र हिस्सा) | २८.०० | ९.५५ |
| कृषि उन्नती योजना -राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान- व्यापारी पिके- ऊस (२४०१ A६०१) (राज्य हिस्सा) | १८.०० | ५.९४ |
| **एकूण** | | **१५.४९** |

३.	सदर निधी अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. प्रकरणी विभागप्रमुख / नियंत्रण अधिकारी यांनी खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखडयानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक; संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास व कृषि व पदुम विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत सूचना देण्यात यावी.

४.	नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी घटक कार्यक्रम क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

५.	आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेली तरतूद फक्त आदिवासी लाभार्थ्यांकरिता व आदिवासी उपयोजना क्षेत्रांतर्गत खर्च करण्यात यावी. तसेच आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेर केलेली तरतूद त्या क्षेत्रातील आदिवासी लाभार्थ्यांकरिताच खर्च करण्यात यावी.

६.	सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या वाचा क्र.१ व २ अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारात तसेच अनौपचारिक संदर्भ क्र. १६५/२०२०/व्यय-१, दि.७.०९.२०२० अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

७	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९२२१४४२२३१८२४ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kiran Kisanrao Pawar

Digitally signed by Kiran Kisanrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=68d8b19f123ba59448c0926a91296205b9a87463f831a2beea0be5cb381a34e8, cn=Kiran Kisanrao Pawar
Date: 2020.09.28 13:05:47 +05'30'

( किरण कि.पवार )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सचिव ( कृषि ) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. आयुक्त ( कृषि), महाराष्ट्र राज्य,पुणे.
३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
४. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
५. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- १९/व्यय १४ ), मंत्रालय, मुंबई.
६. कृषि व पदुम विभाग मंत्रालय, मुंबई.
७. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.

८. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
९. कार्यासन क्र. २ व ९, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१०. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग